**अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम २००८ आणि सुधारित नियम, २०१२.**
**श्री. अरुण दत्तात्रय सोनार, सल्लागार ( Consultant ), वनहक्क कायदा यांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वहका-२०१७/प्र.क्र.१५/का-१४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ०९ फेब्रुवारी, २०१७.

**वाचा :-** १) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ आणि सुधारित नियम २०१२.
२) आदिवासी विकास विभाग, शासन पत्र क्र. विकेंस २०१५/प्र.क्र.६४/का.१९,दि.३ ऑक्टोबर, २०१५.
३) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे आदेश क्र. वहका-२०१५/प्र.क्र.२०१/का.३(७), दि. २८ ऑक्टोबर, २०१५.
४) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे आदेश क्र. वहका-२०१५/प्र.क्र.२०१/का.३(७), दि. १८ मे, २०१६.
५) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे आदेश क्र. वहका-२०१७/प्र.क्र.२०१/का.३(७), दि. १ फेब्रुवारी, २०१७.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी ( वनहक्कांची मान्यता ) अधिनियम, २००६ नियम, २००८ व सुधारणा नियम, २०१२ अंतर्गत वनहक्क कायदयाच्या अंमलबजावणीकरिता आयुक्त व अपर आयुक्त स्तरावर प्रत्येकी एका कन्सल्टंटची नियुक्ती करण्यासंदर्भात संदर्भ क्र. २ येथील दिनांक ३ ऑक्टोबर, २०१५ रोजीच्या शासन पत्रान्वये मान्यता दिलेली असून निवड झालेल्या उमेदवारांची नियुक्ती प्रथमत: सहा महिने व तद्नंतर आवश्यकतेनुसार फक्त पुढील सहा महिन्यासाठी करण्यात यावी, अशी अट विहीत केलेली आहे. त्यास अनुलक्षून आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक येथे एकत्रित मानधनावर तात्पुरत्या स्वरुपात श्री. अरुण दत्तात्रय सोनार यांची कन्सल्टंट म्हणून संदर्भ क्र. ३ येथील आदेशान्वये आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी नियुक्ती केलेली आहे. तद्नंतर त्यांनी संदर्भ क्र. ४ येथील दिनांक १८ मे, २०१६ येथील आदेशान्वये दिनांक ०१/०५/२०१६ ते दिनांक ३०/१०/२०१६ पर्यंत मुदतवाढ दिलेली आहे. आता, संदर्भ क्र. २ येथील शासन पत्रातील अट विचारात घेऊन आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी संदर्भ क्र. ५ अन्वये अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्कांची मान्यता ) अधिनियम, २००६ नियम, २००८ व सुधारणा नियम, २०१२ च्या अंमलबजावणी कामासाठी श्री. अरुण दत्तात्रय सोनार, सल्लागार ( Consultant ) यांची आवश्यकता असून त्यांना १ वर्ष मुदतवाढ देण्याबाबत शिफारस केलेली आहे. सबब, श्री. अरुण दत्तात्रय सोनार, सल्लागार ( Consultant ) यांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्कांची मान्यता ) अधिनियम, २००६ नियम, २००८ व सुधारणा नियम, २०१२ च्या अंमलबजावणी कामासाठी श्री. अरुण दत्तात्रय सोनार, सल्लागार ( Consultant ) यांची संदर्भ क्र. ३ येथील आदेशान्वये दिनांक २८/१०/२०१५ ते दिनांक ३०/०४/२०१६ पर्यंत मासिक करार पध्दतीने मानधन तत्वावर तात्पुरत्या स्वरुपात आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक येथे नियुक्ती केलेली आहे. तद्नंतर संदर्भ क्र. ४ येथील आदेशान्वये त्यांना दिनांक ०१/०५/२०१६ ते दिनांक ३०/१०/२०१६ पर्यंत मानधन तत्वावर मुदतवाढ देण्यात आली. सदरील मुदतवाढ दिनांक ३१/१०/२०१६ रोजी संपुष्टात आलेली आहे.

वनहक्क कायदयाच्या अंमलबजावणीच्या कामकाजाची आवश्यकता विचारात घेऊन श्री. अरुण दत्तात्रय सोनार यांना सल्लागार (Consultant) म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक येथे दिनांक १ नोव्हेंबर, २०१६ पासून ते दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१७ पर्यंत मासिक करार पध्दतीने रुपये ५०,०००/- इतक्या एकत्रित मानधन तत्वावर पुढील १ वर्षासाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२०९१६०९४७९५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar Bapurao Gawade

Digitally signed by Prabhakar Bapurao Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prabhakar Bapurao Gawade
Date: 2017.02.09 16:11:46 +05'30'

**( प्रभाकर बा. गावडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर,अमरावती,
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
७. कक्ष अधिकारी (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२
८. निवड नस्ती.(का.१४)आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.